**सेवानिवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत विभागीय चौकशीची कार्यवाही त्वरेने सुरू करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक, सीडीआर-१०१०/प्र.क्र.५६ /११,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३० ऑक्टोबर, २०१०

**परिपत्रक** :

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, अनेकदा शासकीय अधिकारी/ कर्मचारी सेवानिवृत्त होण्याच्या दिवशी किंवा त्या अगोदर काही दिवस, त्यांच्याविरूद्ध विभागीय चौकशीचा प्रस्ताव शासनाच्या/ समुचित प्राधिकरणाच्या मान्यतेसाठी सादर केला जातो. हे अनुचित आहे. अधिकारी/ कर्मचारी यांच्याविरूद्ध विभागीय चौकशी आवश्यक असेल तर त्या संबंधातील अपहार/ गैरव्यवहार/ अनियमितता उघडकीस आल्यावर तात्काळ विभागीय चौकशीचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करणे आवश्यक आहे. मात्र, क्षेत्रिय कार्यालये किंवा मंत्रालयीन विभाग स्तरावर अशा प्रकरणांत त्वरित प्राथमिक चौकशी करून विभागीय चौकशीचा प्रस्ताव मान्यतेसाठी सादर केला जात नाही. यापैकी अनेक प्रकरणे बऱ्याच आधीची असतात. प्राथमिक चौकशी पूर्ण होऊनही बराच कालावधी झालेला असतो मात्र दोषारोप पत्र बजावण्यास विलंब लावला जातो. काही वेळा अपचाऱ्याचा खुलासाही प्राप्त झालेला असतो परंतु चौकशी अधिकाऱ्याची नियुक्ती त्वरित केली जात नाही. प्रदीर्घ विलंब लावला जातो व कर्मचारी निवृत्तीच्या उंबरठयावर असताना विभागीय चौकशीचा प्रस्ताव सादर केला जातो. अशा प्रकरणात निर्णय घेणाऱ्या प्राधिकरणावर एकतर घाईगडबडीत निर्णय घेण्याची जबाबदारी पडते तसेच, त्यावर तातडीने (म्हणजे कर्मचाऱ्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी) निर्णय न झाल्यास कर्मचारी विनाचौकशी सुटू शकतो किंवा त्यातून न्यायालयीन प्रकरणे उद्‌भवण्याची शक्यता असते.

२. वरील बाबींच्या अनुषंगाने, शासन असे आदेश देत आहे की, प्राथमिक चौकशीअंती तथ्य आढळलेल्या प्रकरणांत नजिकच्या सहा महिन्याच्या काळात सेवानिवृत्त होणारा अधिकारी/ कर्मचारी गुंतला असेल तर, अशा प्रकरणी एक विशेष बाब म्हणून प्राधान्याने संबंधित अधिकारी/ कर्मचाऱ्याच्या सेवानिवृत्ती पूर्वी किमान ३ महिने अगोदर विभागीय चौकशी सुरू होईल व शासन सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : सीडीआर-१०९७/१५६/प्र.क्र.१४/९७/अकरा, दि.२४ फेब्रुवारी, १९९७ नुसार एकुण चौकशीची कार्यवाही एका वर्षात पूर्ण होईल अशा रितीने कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी. प्रकरणाच्या कोणत्याही टप्यावर अकारण विलंब झाल्याचे निदर्शनास आल्यास, अशा विलंबाला जबाबदार असणाऱ्या अधिकारी/ कर्मचाऱ्यावर शिस्तभंगविषयक कारवाईचाही विचार करण्यात यावा.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील सूचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी. तसेच ह्या सूचना त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणून त्यांना त्यांचे कटाक्षाने पालन करण्यास कळवावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( जे. पी. डांगे )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक.

मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
* प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती
*पत्राने

**सुचना** - हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१०११०२२०३६०३००१ असा आहे.